स्वयंम प्रकल्पांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(लेखाशीर्ष २४०३ डी २३९)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : -०१ नोव्हेंबर,२०२१.

वाचा :-

१) शासन निर्णय, वि. वि. क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग,क्र.कुक्कुट-२०१५/प्र.क्र.२७१(भाग-२)/पदुम-४.
३) कृषि व पदुम विभाग नस्ती क्र.बीडीएस-२०२१/प्र.क्र.१३३/पदुम-४.

प्रस्तावना :-

ग्रामीण परसातील कुक्कुट पालन आणि अनुसूचित क्षेत्र/ आदिवासी उपयोजना क्षेत्रामधील अंगणवाड्या मुलांच्या आहारामध्ये पुरवठा करणे व स्वयंरोजगार निर्मिती करण्याकरीता राज्यातील १६ आदिवासी जिल्ह्यांमध्ये राबविण्यात येत असलेल्या स्वयंम प्रकल्पास दि.१.०४.२०२१ पासुन दि.३१.०३.२०२२ पर्यंत मुदतवाढ प्रदान करण्याच्या अनुषंगाने आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या स्वयंम प्रकल्पासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याबाबत कृषी व पदुम विभागाकडून संदर्भाधीन क्र.२ अन्वये प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.१ अन्वये चालू वर्षीच्या अर्थसंकल्पित तरतुदींमधील कार्यकम खर्चासाठी ६० टक्के मर्यादेत निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. सदर मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०३, पशुसंवर्धन - “अंगणवाडयातील बालकांच्या आहारासाठी अंडयांचे उत्पादन व पुरवठा करण्याकरीता अनुसूचित क्षेत्रामध्ये स्वयंरोजगाराकरीता स्वयंम प्रकल्प” योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | या शा.नि. अन्वये वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अंगणवाडयातील बालकांच्या आहारासाठी अंडयांचे उत्पादन व पुरवठा करण्याकरीता अनुसूचित क्षेत्रामध्ये स्वयंरोजगाराकरीता स्वयंम प्रकल्प | २४०३ डी २३९ | १०, कंत्राटी सेवा | ५१.६० | १२.६० |
| | | ३३-अर्थसहाय्य | ००.४० | ००.०० |
| | | ५०-इतर खर्च | १४८.०० | ३१.०० |
| | | **एकूण** | **२००.००** | **४३.६०** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.४३.६० लाख (अक्षरी रुपये त्रेचाळीस लाख साठ हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निधी वितरीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२८११२१३८२१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, serialNumber=2182f4f20daa6841ab430b2fd812e7b5d3a883e72efa574ca5e29ff528bc8015, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2021.11.01 17:24:53 +05'30'

**(वि.फ.वसावे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३. सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.